राज्यात नागरी भागातील अतितीव्र कुपोषित (SAM) बालकांकरीता सुरु करण्यात आलेल्या नागरी बाल विकास केंद्र (UCDC) या योजनेकरीता नवीन लेखाखीर्ष मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

महिला व बाल विकास विभाग

शासन निर्णय क्रमांक - एबावि-२०२४/प्र.क्र.०४ /का.५

नवीन प्रशासन भवन, ३रा मजला,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०००३२.

दिनांक : ८ मे, २०२४

संदर्भ - महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय, क्र - एबावि-२०१९/प्र.क्र.१२९/का.५ दि. ५.३.२०२४

**प्रस्तावना** -:

एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत राज्यातील नागरी भागातील सॅम बालाकांसाठी नागरी बाल विकास केंद्र (UCDC) ही योजना सुरु करण्यास संदर्भाधीन दि. ५.३.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुषंगाने सदर योजनेकरीता नवीन लेखाशीर्ष मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**-:

एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत राज्यातील नागरी भागातील अतितीव्र कुपोषित (SAM) बालकांकरीता नागरी बाल विकास केंद्र (UCDC) ही योजना सुरु करण्यास संदर्भाधीन दिनांक ५.३.२०२४ येथील शासन निर्णयान्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे लेखाशीर्ष मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| **Head** | **लेखाशीर्ष** |
|---|---|
| Demand No.X-1 | मागणी क्र. एक्स-१ |
| 2236- Nutrition | २२३६-पोषण व आहार |
| 02-Distribution of Nutritious Food and Beverages | ०२-पोषक अन्न व पेये यांचे वितरण |
| 101- Special Nutrition Programmes | १०१- विशेष पोषण आहार कार्यक्रम |
| (09) Treatment of Severely Malnourished Children | (०९) अतितीव्र कुपोषित बालकांवर उपचार |
| (09) (02) Urban Child Development Centres (UCDC) (Scheme) (2236 2638) | (०९) (०२)- नागरी बाल विकास केंद्र (कार्यक्रम) (२२३६ २६३८) |

२. सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभाग तसेच, महालेखापाल, मुंबई यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. उपरोक्त लेखाशीर्षांतर्गत आवश्यकतेनुसार संबंधित उद्दिष्टाखाली तरतुद अर्थसंकल्पित करण्यात येईल. त्यानुसार सदर योजनेकरीता येणारा खर्च उपरोक्त लेखाशीर्षामध्ये मंजूर करण्यात येणाऱ्या तरतुदीमधून भागविण्याची दक्षता आयुक्त, एकात्मिक सेवा योजना, नवी मुंबई यांनी घ्यावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०५०८११०१५१९७३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2024.05.09 15:19:33 +05'30'

(वि.रा.ठाकूर)
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) महालेखापाल लेखा परीक्षा नागपूर / मुंबई २/ १ महाराष्ट्र ,लेखा अनुज्ञेयता /
२) सचिव, महिला व बाल विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई ,
४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
५) संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई
६) सर्व विभागीय उपायुक्त (महिला व बाल विकास)
७) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास) जिल्हा परिषद
८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
९) निवासी लेखापरीक्षा अधिकारी
१०) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी प्रकल्प)
११) निवडनस्ती (का-५)